**पावसाळयाच्या चार महिन्यांमध्ये विविध आजारांनी अथवा कुपोषणामुळे आदिवासी भागात होणारे मुलांचे मृत्यू <u>टाळण्यासाठी उपाययोजना.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : साआवि-१०९६/प्र.क्र.१६७/का.८**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक : २७ जून, १९९६.**

**<u>प्रस्तावना</u> :-** राज्याच्या अतिदुर्गम आदिवासी भागामध्ये पावसाळयामध्ये इतर भागांशी संपर्क तुटलेल्याने विविध आजार उद्‌भवतात. त्यामुळे कुपोषणाचे प्रश्न उद्‌भवतात. यावर मात करण्याकरिता व आदिवासी जनतेला आरोग्य सुविधा, पोषण, खावटी कर्ज इत्यादी तातडीने उपलब्ध व्हावे यासाठी उपाययोजना म्हणून शासनाने खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याचा निर्णय घेतलेला आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

खालील सुविधा तातडीने उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देत आहे.

**<u>अ) आरोग्य विषयक बाबी</u> :-**

**<u>१) मदत पथके</u> :-** ठाणे (३५), अमरावती (२५), धुळे (२५), गडचिरोली (१९) नाशिक (२५) अशी एकूण १२९ मदत पथके त्वरेने निर्माण करण्यास व त्यासाठी आवश्यक रुपये ३९ लाख खर्च करण्यास शासन मान्यता देत आहे.

२) वरील ५ जिल्हयांतील आदिवासी पाडयांमध्ये ४ महिन्यांच्या कालावधीसाठी एकूण ११५०० स्वयंसेवक नेमण्यास व त्यासाठी प्रत्येकी रु.२५०/- दरमहा मानधन विचारात घेऊन रु.१६०.७५ लाख इतक्या खर्चास शासन मान्यता देत आहे.

**<u>वाहन खरेदी</u> :-** सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारीतील उपलब्ध तरतूदींपैकी रुपये २४ लाख इतक्या रकमेत वाहन खरेदी करण्यास शासन मान्यता देत आहे. अधिक वाहनांची गरज पडल्यास संबंधित जिल्हाधिकारी ही वाहने अधिगृहित करुन देतील.

**<u>४) प्रयोगशाळा तंत्रज्ञांची पद निर्मिती</u> :-** आदिवासी उपयोजना क्षेत्रात रुग्णांचे रक्त नमुने त्वरीत तपासून त्यांच्यावर उपचार होण्याच्या दृष्टीने आदिवासी उपयोजना क्षेत्रात २६९ प्रयोगशाळा

तंत्रज्ञांची पदे निर्माण करण्यास व त्यासाठी होणा-या रुपये १,३०,५७,०००/- (रुपये एक कोटी तीस लाख सत्तावन्न हजार फक्त) इतक्या खर्चास शासन मान्यता देत आहे.

**<u>५) बहुउद्देशीय आरोग्य कर्मचा-यांची पद निर्मिती</u> :** राज्यातील आदिवासी उपयोजना क्षेत्रातील १२ जिल्हयातील ५९७ उपकेंद्रांकरिता रुपये ९५७-२५-११५०-३०- १६६० या वेतनश्रेणीतील बहुउद्देशीय आरोग्य कर्मचा-यांची (पुरुष) ५९७ पदे निर्माण करण्यास व त्याकरिता येणा-या रु.९८.५० लाख खर्चास मंजूरी देण्यात येत आहे.

**<u>ब) पोषण :-</u>**

परिच्छेद अ (१) मध्ये उल्लेखित ५ जिल्हयांतील एकात्मिक बालविकास सेवा योजनेंतर्गत आदिवासी प्रकल्पातील ६ महिने ते ३ वर्षे वयोगटातील बालकांना, गरोदर स्त्रियांना व स्तनदा मातांना पुरेसा पोषक आहार स्थानिक ठिकाणी तयार करुन देण्यात यावा. हा आहार पौष्टिक असणे शक्य व्हावे म्हणून श्रेणी-१ च्या लाभार्थ्यांना प्रती लाभार्थी प्रतिदिन रु.२/- प्रमाणे व श्रेणी २,३ व ४ च्या सर्व लाभार्थ्यांना प्रती लाभार्थी प्रतिदिन रु.३/- या दराने आहाराचा पुरवठा करण्यास व त्यासाठी जुलै ते ऑक्टोबर अखेर या ४ महिन्यांकरिता आवश्यक रुपये १० कोटी इतक्या रकमेस शासन मान्यता देत आहे.

**<u>क) खावटी कर्ज :-</u>**

आदिवासी विकास महामंडळामार्फत आदिवासी कुटुंबांना त्वरेने खावटी कर्ज देणे शक्य व्हावे म्हणून ४ युनिटपर्यंतच्या कुटुंबांना प्रत्येकी रु.४००/-, ८ युनिटपर्यंत प्रत्येकी रुपये ८००:- व त्यावरील कुटुंबांना प्रत्येकी रु.१०००/- अशा सुधारित दराने खावटी कर्ज मंजूर करण्यास व त्यासाठी रुपये ४ कोटीच्या अनुदानास शासन मान्यता देत आहे.

**ड)** वर मान्यता दिलेल्या सर्व निर्णयांबाबतचे सविस्तर आदेश संबंधित विभागामार्फत निर्गमित करण्यात यावेत. या निर्णयाच्या अंमलबजावणीसाठी वर उल्लेखिलेल्या रकमा अर्थसंकल्पित करण्यासाठी व जरुर तर आकस्मिकता निधीतून अग्रीम घेण्यासाठी त्या त्या विभागाने तातडीने कार्यवाही करावी. तसेच वरील कार्यक्रमांच्या अंमलबजावणीसाठी आवश्यक त्या सविस्तर सूचना/आदेश संबंधितांना द्यावेत.

**<u>इ) प्रशासकीय यंत्रणा :-</u>**

वरील निर्णय कार्यान्वित करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी व प्रकल्प अधिकारी यांची राहिल. तथापि, प्रभावी अंमलबजावणीसाठी प्रत्येक आदिवासी तालुक्यासाठी प्रकल्प अधिका-याच्या अध्यक्षतेखाली एक उप/सहायक जिल्हाधिकारी, जिल्हा परिषदेचा एक अधिकारी अशा तिघांची एक समिती असेल. ते कामाची तपासणी व संनियंत्रण करतील. संबंधित

बालविकास प्रकल्प अधिकारी, तहसिलदार व गट विकास अधिकारी यांना मार्गदर्शन करतील, तालुक्याला वारंवार भेटी देतील, कामाचा आढावा घेतील व आवश्यक ते आदेश देतील/कारवाई करतील. रोजगार हमीची कामे व स्वस्त धान्य दुकाने तपासण्याचे व पुढील कारवाई करण्याचे अधिकार प्रकल्प अधिकारी यांना प्रदान करण्यात येत आहेत. यासंबंधीचे औपचारिक आदेश संबंधित जिल्हाधिका-याने काढावेत.

**फ)** कुपोषण प्रतिबंधक कार्यक्रमाची तसेच आरोग्य इत्यादि तद्नुषंगिक बाबींची समन्वित व परिणामकारक अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित विभागीय आयुक्तांवर सोपविण्यात येत आहे.

हा शासन निर्णय वित्त विभाग व नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : पी.एस.एफ.क्र.४९०५, दिनांक २५ जून, १९९६ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( राजेंद्र सिंह )
सचिव,
आदिवासी विकास विभाग.